GR-20041008113959002.1201

**० ते १०० हे.सिंचन क्षमतेच्या जिल्हा परिषदेच्या अखत्यारीतील/अधिकारातील ल.पा. योजनांना प्रशासकीय मान्यता प्रदान करुन अंमलबजावणी करण्याबाबतचे नियोजन.**

महाराष्ट्र शासन,
परिपत्रक क्र. लपायो २००१/प्र.क्र.१०४/जल ५,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक [illegible] सप्टेंबर, २००१.

**पूर्वपिठीका :-**

जिल्हा परिषद ॲक्ट १९६१ मधील परिच्छेद क्र.१०० अन्वये ० ते १०० हे. सिंचन क्षमतेचे प्रकल्प जिल्हा परिषदेमार्फत कार्यान्वित करण्यांत येतात. प्रशासकीय मान्यतेचे व अंमलबजावणी करण्याचे अधिकार जिल्हा परिषदेस आहेत व त्यांच्या अंमलबजावणीसाठी जिल्हा नियोजन व विकास मंडळातर्फे आर्थिक तरतूद करण्यांत येते. या अनुषंगाने जिल्हा परिषदेने आजपर्यंत ब-याचशा योजना कार्यान्वित केल्या आहेत. वित्तीय तरतूदीच्या उपलब्धतेचा विचार न करता आणि अपूर्ण कामे प्रथम पूर्ण न करता ब-याच नवीन योजना हाती घेतल्या आहेत. त्यामुळे अपूर्ण कामांची संख्या व उपलब्ध निधीचे व्यस्त प्रमाण निर्माण झाले आहे. पर्यायाने योजनांच्या कामाची व भूसंपादनाची आवश्यक देयके ब-याच प्रमाणात प्रलंबित आहेत असे निदर्शनास आले असून अपूर्ण योजनांच्या भूसंपादनासाठी सुमारे रु.२० कोटीचे दायित्व जिल्हा परिषदेस आहे.

अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्था-स्तर) मंडळ, यांना तांत्रिक मंजूरी प्रदान करण्याखेरीज बांधकामाच्या अंमलबजावणीबाबत (नियोजन, कामाची तपासणी वगैरे) कोणतेही अधिकार नाहीत. बांधकामाची गुणवत्ता तपासण्यासाठी गुणनियंत्रण चाचणी यंत्रणा जिल्हा परिषदेअंतर्गत उपलब्ध नाही. त्यामुळे बांधकामाधीन योजनांच्या कामाबाबतची गुणवत्ता तपासणी बांधकाम चालू असतांना केली जात नाही असे निदर्शनास आले आहे. त्यामुळे निकृष्ट बांधकामाबाबत शासनाकडे तक्रारी प्राप्त झाल्या आहेत.

वरील परिस्थितीच्या संदर्भात उपाय योजनेच्या दृष्टीने खालील सूचना निर्गमित करण्यांत येत आहेत.

१. अधीक्षक अभियंता यांचा तांत्रिक सल्ला बांधकामाबाबत घेणे अनिवार्य आहे.
२. नियतव्ययाच्या अधीन राहून विशेष दुरुस्तीची कामे प्राधान्याने घेण्याबाबत अधीक्षक अभियंता यांची मान्यता घेणे आवश्यक आहे.
३. अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्था.स्तर) मंडळ यांनी त्यांच्या संबंधित क्षेत्रातील जिल्हा परिषदेच्या बांधकामांची १० टक्के तपासणी त्यांच्या अधिनस्त कार्यकारी अभियंता यांचेकडून वेळोवेळी करावी व त्याबाबतचे अहवाल शासनास सादर करावे.
४. कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद यांनी अधीक्षक अभियंता, ल.पा.(स्था.स्तर) मंडळ यांच्या पाहणी अहवालाची अंमलबजावणी करुन त्याचाही अहवाल शासनास सादर करणे अनिवार्य आहे.
५. बांधकामाचे देयक मंजूर करतांना त्या बांधकामाचा गुणनियंत्रण चाचणी अहवाल जो शासकीय गुणनियंत्रण चाचणी यंत्रणेमार्फत करण्यांत आला आहे तो देयकासोबत जोडणे आवश्यक आहे व त्यानंतरच त्या बांधकामाचे भुगतान करावे नसता निकृष्ट बांधकामाबाबतची संपूर्ण जबाबदारी कार्यकारी अभियंता यांची राहील याची नोंद घ्यावी.
६. नवीन कामे हाती घेण्यापूर्वी निधी उपलब्धतेची खात्री करुन व अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्था-स्तर) मंडळ यांची पूर्वसंमती घेऊन कामे सुरु करण्यांत यावी.

७. जिल्हा नियोजन व विकास मंडळाकडून उपलब्ध होणा-या निधीचा वापर जिल्हा परिषदेकडे आतापर्यंत निर्माण झालेले दायित्व विचारात घेऊन अपूर्ण कामे पूर्ण करण्यासाठी प्रथमत: करावा.

८. लघु पाटबंधारे प्रकल्पातून सिंचनासाठी पुरविलेल्या पाण्यापासून पाटबंधारे विभागाने ठरवून दिलेल्या पाणीपट्टीनुसार संबंधित लाभधारकांकडून वसुली अद्याप करण्यांत आलेली नाही. या वसुलीत मुख्यत: देखभाल व दुरुस्तीचा खर्च करावयाचा असल्याने वसुली प्राधान्याने करण्यांत यावी व त्यातूनच देखभाल दुरुस्तीचा खर्च भागवावा.

९. दि.३१.७.२००० च्या शासन निर्णयास अनुसरून लाभधारकांची पाणी वापर संस्था स्थापन करून सिंचन व्यवस्थापनाचे काम हस्तांतर करण्याबाबत जातीने लक्ष घालावे.

१०. वरील सूचनांच्या अंमलबजावणीबाबतचा अहवाल संबंधित अधिका-यांनी शासनास दर ३ महिन्यांनी सादर करावा.

वरील सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल याची सर्व क्षेत्रिय अधिका-यांनी दक्षता घ्यावी. यातील सूचनांचे पालन न करणा-या अधिका-यांविषयी गंभीर दखल घेऊन योग्य ती कारवाई करण्यांत येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( वी.एम.केंद्रेकर )
शासनाचे अवर सचिव.

प्रत :-

१. विभागीय आयुक्त, सर्व.
२. मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्था.स्तर) पुणे.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
४. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
५. अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्था.स्तर) मंडळ, ठाणे / नाशिक / पुणे / अमरावती / औरंगाबाद / नागपूर.
६. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
७. कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, जिल्हा परिषद, सर्व.
८. कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे (स्था.स्तर) विभाग, सर्व.